झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण बृहन्मुंबई येथील वरिष्ठ पदावरील अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासाठी "छाननी समिती" (Screening Committee) गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : प्रतिनि-१४०७/प्र.क्र.१२३/१४/झोपसू-१,**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**

**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**

**दिनांक: ३ सप्टेंबर, २०१४**

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र झोपडपट्टी क्षेत्र (सुधारणा,निर्मूलन व पुनर्विकास) अधिनियम, १९७१ मधील कलम **3I** मध्ये झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणास त्यांचे कर्तव्य व जबाबदाऱ्या प्रभावीपणे पार पाडण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी यांना दुय्यम असलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या करण्याचे अधिकार असतील अशी तरतूद करण्यात आली आहे.

२. महाराष्ट्र झोपडपट्टी क्षेत्र (सु.नि.व पु.) अधिनियम, १९७१ मध्ये दिनांक २ मे, २०१४ च्या अधिसूचनेनुसार झालेल्या सुधारणांनुसार संरक्षणपात्र झोपडीधारकांचा अर्हता दिनांक १.१.१९९५ वरुन १.१.२००० असा करण्यात आला आहे. परिणामी झोपडपट्टी पुनर्वसन योजनेंतर्गत मोठया संख्येने पात्र होणाऱ्या झोपडपट्टीवासियांचे कालबध्द व लोकाभिमुख पध्दतीने पुनर्वसन होणे आवश्यक असल्याने झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचे दैनंदिन कामकाज आणखी प्रभावीपणे होणे अपेक्षित राहील. त्यामुळे झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणात शासनाच्या विभागातून तसेच निमशासकीय संस्थांमधून प्रतिनियुक्तीने नियुक्त केल्या जाणाऱ्या वरिष्ठ अधिकारी वर्गाचे पॅनेल तयार करुन त्यातील सक्षम व कार्यक्षम अशा सुयोग्य अधिकाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्त्या होणे आवश्यक आहे. यास्तव महाराष्ट्र झोपडपट्टी क्षेत्र (सु.नि.व पु.) अधिनियम, १९७१ च्या कलम **3I** च्या तरतूदीची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण बृहन्मुंबई या कार्यालयातील वरिष्ठ पदांवर प्रतिनियुक्तीने सुयोग्य अधिकाऱ्यांच्या नियुक्त्या होण्यासाठी एक "छाननी समिती" (Screening Committee) गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने खालीलप्रमाणे "छाननी समिती" (Screening Committee) गठीत करण्याचा निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

१. अ) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण बृहन्मुंबई या कार्यालयातील मंजूर आकृतीबंधातील पदांपैकी ज्या पदांचे श्रेणी वेतन शासन सेवेतील गट "ब" पदांइतके अथवा त्यापेक्षा जास्त आहे, त्या पदांवर शासन सेवेतील अथवा निमशासकीय संस्था जसे बृहन्मुंबई महानगरपालिका, म्हाडा, सिडको, एमआयडीसी इत्यादी यांच्या कार्यालयातील तत्सम सुयोग्य अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याचा विचार करण्यासाठी खालील प्रमाणे "छाननी समिती" (Screening Committee) गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव /सचिव, गृहनिर्माण विभाग | अध्यक्ष |
| २ | महापालिका आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका किंवा अतिरिक्त महानगरपालिका आयुक्तांपेक्षा कमी दर्जा नसलेले त्यांचे प्रतिनिधी. (बृहन्मुंबई महानगर पालिकेमधील अधिकारी/अभियंत्याच्या नियुक्तीबाबत) | सदस्य |
| ३ | उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण किंवा म्हाडाच्या घटक मंडळाचे मुख्य अधिकारी त्यांचे प्रतिनिधी म्हणून (म्हाडामधील अधिकारी/अभियंत्यांच्या नियुक्तीबाबत) | सदस्य |
| ४ | मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई | सदस्य |
| ५ | उप सचिव, गृहनिर्माण विभाग | सदस्य सचिव |

(ब) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, बृहन्मुंबई येथील सोबतच्या परिशिष्ठामध्ये दर्शविलेल्या पदावरील प्रतिनियुक्तीकरीता शासकीय अथवा निम शासकीय संस्था जसे बृहन्मुंबई महानगरपालिका/ म्हाडा अथवा सिडको, एम.आय.डी.सी. इत्यादि कार्यालयातील अधिकाऱ्यांचे गृहनिर्माण विभागाकडे प्राप्त झालेले सर्व प्रस्ताव छाननी समितीच्या बैठकीत शिफारशींच्या प्रयोजनार्थ सादर करण्यात येतील. उपरोक्त प्रस्ताव प्राप्त झालेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत त्या अधिकाऱ्यांच्या ( i ) अलिकडच्या ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाची प्रतवारी ( ii ) गृहनिर्माण व नगर विकास व अनुषंगिक क्षेत्रातील कामकाजाच्या अनुभवाची माहिती व ( iii ) अधिकाऱ्यांविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही अथवा फौजदारी स्वरुपाचे अन्वेषण प्रलंबित/प्रस्तावित असल्यास अथवा कोणत्याही स्वरुपाचे दोषारोप सिध्द झालेले असल्यास अथवा शिक्षा अथवा दंड झालेला असल्यास ती माहिती, सदर "छाननी समिती" (Screening Committee ) विचारात घेईल.

२. झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण बृहन्मुंबईच्या कार्यालयातील पदे भरण्याची निकड विचारात घेऊन सदरहू "छाननी समिती" (Screening Committee) च्या बैठका आवश्यकतेप्रमाणे व किमान ३ महिन्यात एकदा आयोजित करण्यात येईल,व समितीच्या शिफारशी महाराष्ट्र झोपडपट्टी क्षेत्र (सु.नि.व पु.)अधिनियम, १९७१ च्या कलम **3 I** अन्वये निर्णयार्थ झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाचे अध्यक्ष यांना गृहनिर्माण विभागामार्फत मान्यतेसाठी सादर करण्यात येतील.

३. झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण मुंबईच्या कार्यालयात कार्यरत असलेल्या उपरोक्त अधिकाऱ्यांच्या "कामगिरीचे मूल्यमापन" ( Performance Evaluation ) साधारणपणे त्या अधिकाऱ्यांची प्रत्येक वर्षाची सेवा पूर्ण झाल्यावर त्यांच्या प्रतिनियुक्तीवरील सेवा पुढील वर्षासाठी चालू ठेवणे उपयुक्त आहे किंवा कसे, याचा सुध्दा आढावा सदर "छाननी समिती" (Screening Committee) कडून घेऊन योग्य ती शिफारस प्राधिकरणाचे अध्यक्ष यांच्या मान्यतेसाठी सादर करण्यात येतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.internet.maharashtra.gov.in या वेबसाईट वर उपलब्ध करुन देण्यांत आला असून, त्याचा संकेतांक क्र. २०१४०९०४१२५११३८९१०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Salvi Rajaram Ganpat

Digitally signed by Salvi Rajaram Ganpat
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HSG, postalCode=400032, st=MAHARASHTRA, cn=Salvi Rajaram Ganpat
Date: 2014.09.04 12:47:50 +05'30'

(रा.ग.साळवी)

उप सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत-

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री,गृहनिर्माण यांचे खाजगी सचिव,
३. मा.मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,महसूल व वन विभाग/नगर विकास विभाग/वित्त विभाग, सहकार विभाग,मंत्रालय, मुंबई.
४. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
५. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, महापालिका मार्ग, फोर्ट, मुंबई-४०० ००१.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, शहर औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, अनंत काणेकर मार्ग, प्रशासकीय इमारत, बांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
९. निवडनस्ती (झोपसु-१)

परिशिष्ट

झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण

आकृतीबंध- २०१४

| क्र. | पदाचे नाव | सुधारीत आकृतीबंधानुसार एकूण पदे |
|---|---|---|
| १ | सचिव ( अपर जिल्हाधिकारी संवर्ग) | १ |
| २ | अवर सचिव | १ |
| ३ | कक्ष अधिकारी | २ |
| ४ | सहाय्यक | १ |
| ५ | उप जिल्हाधिकारी | ३ |
| ६ | तहसिलदार | ३ |
| ७ | नायब तहसिलदार | ९ |
| ८ | उपमुख्य अभियंता | २ |
| ९ | कार्यकारी अभियंता | ५ |
| १० | सहाय्यक अभियंता | १६ |
| ११ | दुय्यम अभियंता | ३२ |
| १२ | उपसंचालक नगररचना | १ |
| १३ | नगर रचनाकार | १ |
| १४ | सहाय्यक नगर रचनाकार | १ |
| १५ | रचना सहाय्यक | १ |
| १६ | आरेखक | २ |
| १७ | वित्त नियंत्रक/सह संचालक लेखा व कोषागर | १ |
| १८ | लेखाधिकारी | १ |
| १९ | सहाय्यक लेखा अधिकारी ( वित्त निरिक्षक ) | १ |
| २० | अधीक्षक भूमि अभिलेख | १ |
| २१ | परिरक्षण भूमापक | ३ |

| | | |
|---|---|---|
| २२ | सहनिबंधक | १ |
| २३ | उपनिबंधक | १ |
| २४ | सहाय्यक निबंधक | १ |
| २५ | सहकारी अधिकारी- १ | ४ |
| २६ | सहकारी अधिकारी- २ | ३ |
| २७ | विधी सल्लागार | १ |
| | एकूण | ९९ |